**४ थी खेलो इंडिया युवा राष्ट्रीय स्पर्धा, हरियाणा-२०२१ -**

**राज्यस्तरीय स्पर्धा व राज्य संघ निवड कार्यक्रम तसेच, राष्ट्रीय स्पर्धापूर्व प्रशिक्षण शिबीर व राष्ट्रीय स्पर्धा सहभाग यासाठीच्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः केआपी-१९२१/प्र.क्र.२५५/क्रीयुसे-१,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०६ मे, २०२२

**वाचा :-**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.केआयपी-२३१६/ प्र.क्र.८७/ क्रीयुसे-१, दिनांक २० नोव्हेंबर, २०१८.

२) भारतीय युवा व खेळ मंत्रालयाचे पत्र क्र.KIYG-IV/GTCC/०८०८/२०१९-२०, दिनांक १२ मे, २०२१ व दिनांक २०.१०.२०२१ ची पत्रे.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२.

४) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे क्र.क्रीयुसे/खेलोइंडिया/संघनिवड/२०२१-२२/का-४, दि.१० डिसेंबर, २०२२ चे पत्र.

५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे क्र.क्रीयुसे/खेइंरायुक्रीस्प/शिबीर/२०२१-२२/का-४/११९, दि.०६ जानेवारी, २०२२ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

"खेलो इंडिया - क्रीडा विकासासाठी राष्ट्रीय कार्यकम" ही केंद्र पूरस्कृत योजना दिनांक १६.१०.२०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये संपूर्ण देशात लागू करण्यात आली आहे. सदर योजनेनुसार, देशभरातील विविध खेळप्रकारामधील प्रतिभावंत खेळाडूंचा शोध घेण्याकरीता, केंद्र शासनाच्या क्रीडा व युवक कल्याण मंत्रालयाद्वारा सन २०१८-१९ पासून खेलो इंडिया युवा क्रीडा स्पर्धेचे आयोजन करण्यात येत आहे.

त्यानुसार चौथ्या खेलो इंडिया युवा राष्ट्रीय क्रीडा स्पर्धा या दिनांक ४ जून, २०२२ ते दिनांक १३ जून, २०२२ या कालावधीत हरियाणा (पंचकुला) येथे आयोजित करण्यात आलेली आहे. या स्पर्धेत १८ वर्षाखालील मुलां-मुलींचा समावेश करण्यात आलेला आहे. चौथ्या खेलो इंडिया युवा राष्ट्रीय स्पर्धेत महाराष्ट्र राज्याला अधिकाधिक पदके मिळून देशाच्या पदकतालिकेमध्ये प्रथम स्थान अबाधित रहावे, यासाठी महाराष्ट्र राज्यासाठी निवडण्यात आलेल्या कबड्डी, खो-खो व बास्केटबॉल या सांघीक खेळ प्रकारांसाठी संघाची निवड करण्याकरीता, प्रथम टप्प्यात जिल्हा, विभाग व राज्यस्तरीय निवड चाचणी स्पर्धांचे आयोजन करण्यात येऊन त्याद्वारे राज्य संघ निवडीचा कार्यक्रम पार पाडण्यात आलेला आहे. वैयक्तीक खेळ प्रकारांमधील खेळाडूंची निवड संबंधीत खेळाच्या राष्ट्रीय फेडरेशनद्वारे करण्यात येणार आहे. राज्यातील एकूण ४२० खेळाडूंची स्पर्धेसाठी निवड करण्यात आली आहे. त्यांचेसोबत मार्गदर्शक, सहाय्यक मार्गदर्शक, पदाधिकारी, व्यवस्थापक, सहाय्यक व्यवस्थापक अशा १३० अधिकाऱ्यांचे पथक खेळाडूंसोबत स्पर्धेच्या ठिकाणी जाणार आहे. प्रथम टप्प्यातील जिल्हा, विभाग व राज्यस्तरीय निवड चाचणी स्पर्धांचे आयोजनाकरीता क्रीडा संचालनामार्फत संदर्भ क्र.४ येथील दिनांक १०.१२.२०२२ अन्वये रु.६१,४१,०००/- खर्चाचे अंदाजपत्रक शासनास सादर करण्यात आले आहे.

दुसऱ्या टप्प्यात राष्ट्रीय स्पर्धापूर्व प्रशिक्षण शिबीर व राष्ट्रीय स्पर्धा याचा समावेश आहे. याकरीता निवड चाचणीद्वारे राज्य संघात निवड झालेल्या खेळाडूंचे १३ दिवसीय प्रशिक्षण शिबीर श्री शिवछत्रपती क्रीडा संकुल, बालेवाडी,पुणे येथे दिनांक १८ मे, २०२२ पासून आयोजित करण्यात येणार आहे. सदर राष्ट्रीय स्पर्धापूर्व प्रशिक्षण शिबीर व त्यानंतर राष्ट्रीय स्पर्धा सहभाग याकरीता क्रीडा संचालनालयाने संदर्भ क्र.५ येथील दिनांक ०६.०१.२०२२ च्या पत्रान्वये रु.१,४८,१२,८००/- इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक शासनाच्या मान्यतेस्तव सादर केले आहे. यानुसार हरियाणा येथे होणाऱ्या ४ थ्या खेलो इंडिया युवा राष्ट्रीय क्रीडा स्पर्धेसाठीच्या एकूण रु.२,०९,५३,८००/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास मंजूरी देण्याची विनंती केली आहे.

पुणे ते हरियाणा (पंचकुला) हे अंतर रेल्वेद्वारे साधारणत: ३० तासांचे आहे. राष्ट्रीय स्पर्धेत सहभागी होणाऱ्या राज्यातील खेळाडूंना प्रवासाचा थकवा जाणवून त्यांच्या कामगिरीवर विपरीत परिणाम होऊ नये, यासाठी गतवर्षी प्रमाणेच यावर्षीही स्पर्धेसाठी निवडलेल्या ४२० खेळाडूंना, १३० पदाधिकाऱ्यांसह हरियाणा येथे जाण्याकरीता विमानप्रवासाची सुविधा

उपलब्ध करण्यात येणार आहे. परतीचा प्रवास रेल्वेद्वारे करण्याचे नियोजन आहे. सदर स्पर्धा सुरु होण्यासाठी शिल्लक राहिलेला एक महिन्यांचा कमी कालावधी लक्षात घेता, प्रवासखर्चात बचत करण्याच्या दृष्टीने प्रवासाकरीता आगावू आरक्षण करणे योग्य होईल.

वरीलप्रमाणे, ४ थ्या खेलो इंडिया स्पर्धेसाठी राज्यस्तरावरील राज्य संघाची निवड चाचणी, राष्ट्रीय स्पर्धापूर्व प्रशिक्षण शिबीर कार्यक्रम व राष्ट्रीय स्पर्धा यासाठी व स्पर्धेतील खेळाडू, मार्गदर्शक व व्यवस्थापक यांच्या भोजन, निवास, प्रवासखर्च, अधिकाऱ्यांचे मानधन व क्रीडा साहित्य व वैद्यकीय साहित्य खरेदी इ. बाबींसाठी आवश्यक रु.२,०९,५३,८००/- खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

"खेलो इंडिया - क्रीडा विकासासाठी राष्ट्रीय कार्यकम" या केंद्र पूरस्कृत योजनेंतर्गत चौथ्या खेलो इंडिया युवा राष्ट्रीय स्पर्धा, **दिनांक ४ जून, २०२२ ते दिनांक १३ जून, २०२२** या कालावधीत हरियाणा (पंचकुला) येथे आयोजित करण्यात आलेली आहे. सदर स्पर्धेत सहभागी होण्याकरीता राज्यातून कबड्डी, खो-खो, या सांघीक खेळ प्रकारामधील मुलां-मुलींच्या संघांची निवड करण्याकरीता व बास्केटबॉल या खेळ प्रकारासाठी मुलींच्या संघाच्या निवडीकरीता आयोजित केलेल्या राज्य संघांच्या निवड चाचणी स्पर्धा कार्यक्रमासाठी सोबतच्या परिशिष्ट-अ प्रमाणे अंदाजे रु.६१,४१,०००/- खर्च तसेच राष्ट्रीय स्पर्धापूर्व प्रशिक्षण शिबीर कार्यक्रमाचा खर्च तसेच, प्रत्यक्ष स्पर्धेत सहभागी होणारे अंदाजे ४२० खेळाडू व त्यांचेसोबत १३० मार्गदर्शक, संघ व्यवस्थापक, फिजिओथीरोपिस्ट, वैद्यकीय/तांत्रिक अधिकारी यांचा निवास व भोजन खर्च, प्रवासखर्च, अधिकाऱ्यांचे मानधन व क्रीडा साहित्य व वैद्यकीय साहित्य खरेदी इ. करीता सोबतच्या परिशिष्ट-ब मधील तपशिलानुसार अंदाजे रु.१,४८,१२,८००/- खर्च अशा एकूण रु.२,०९,५३,८००/- (अक्षरी रुपये दोन कोटी, नऊ लक्ष, त्रेपन्न हजार, आठशे फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च, “मागणी क्रमांक ई-३, लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (०५)(०६) शालेय क्रीडा स्पर्धांचे आयोजन (कार्यक्रम), ३१, सहाय्यक अनुदाने, (वेतनेतर), संगणक क्रमांक २२०४-५६३५ या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध रु.१३००.०० लक्ष तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत तरतूदीमधून वरीलप्रमाणे मंजूर रु.२,०९,५३,८००/- इतका निधी वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, यांच्या अधिनस्त ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. वित्त विभाग, परिपत्रक दिनांक ०४.०४.२०२२ अन्वये दिलेल्या निर्देशांनुसार मंजूर निधी वितरीत करुन खर्च करण्याची कार्यवाही करण्यात यावी. यासाठीचा निधी आहरीत करण्यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. यासंदर्भात वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये प्राप्त वित्तीय अधिकारांनुसार व त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणांनुसार मंजूर रक्कम खर्च करण्याची कार्यवाही करण्यात यावी. तसेच, मंजूर रकमेच्या विनियोगाबाबत उपयोगीता प्रमाणपत्र शासनास सादर करणे आवश्यक राहील.

६. साहित्य खरेदी व सेवापुरवठादारांमार्फत सेवा उपलब्ध करुन घेण्याबाबत उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ मधील तरतूदींनुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५०६१२५५००९५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sameer Anant Sawant
Date: 2022.05.06 12:59:15 +05'30'

**(समीर सावंत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.राज्य मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
९) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१/२,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१०) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१३) लेखा अधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
१४) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
१५) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( क्रीडा संचालनालयामार्फत),
१६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
१७) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) / (क्रीयुसे-२) / (क्रीयुसे-३), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१८) निवड नस्ती (क्रीयुसे-१)

**शासन निर्णय क्रमांकः केआपी-१९२१/प्र.क्र.२५५/क्रीयुसे-१, दिनांक ६ मे, २०२२ सोबतचे परिशिष्ट.**

४ थी खेलो इंडिया युवा राष्ट्रीय स्पर्धा, हरियाणा-२०२१ साठी राज्यस्तरीय स्पर्धा व राज्य संघ निवड कार्यक्रम खर्च.

## परिशिष्ट-अ

<table>
<tr><th>स्पर्धेचा स्तर</th><th>खर्चाच्या बाबी</th><th>आवश्यक निधी (रुपये)</th></tr>
<tr><td>अ</td><td>जिल्हास्तर -स्पर्धा व निवड चाचणी आयोजनाचा खर्च-:<br>प्रतिखेळ रु.२०,०००/- प्रमाणे एकूण ३ खेळांसाठी प्रतिजिल्हा रु.६०,०००/- याप्रमाणे. (३६ जिल्हे X ६००००/-)</td><td>२१,६०,०००</td></tr>
<tr><td></td><td>एकूण- अ</td><td>२१,६०,०००</td></tr>
<tr><td>ब</td><td>विभागीय स्तर -स्पर्धा व निवड चाचणी आयोजन खर्चः-
<table>
<tr><th></th><th>संख्या</th><th>दर/दिवस</th><th>रक्कम (रुपये)</th></tr>
<tr><td>भोजन व निवासाचा खर्च वैयक्तीक खेळप्रकार -</td><td>२०१६</td><td>२X२५०</td><td>१०,०८,०००</td></tr>
<tr><td>भोजन व निवास खर्च सांघीक खेळप्रकार</td><td>७२०</td><td>१X२५०</td><td>१,८०,०००</td></tr>
<tr><td>प्रवासभत्ता<br>१.सर्व खेळाडू-<br>२.निवडसमिती सदस्य<br>३.पंच/सामनाधिकारी</td><td><br>२७३६<br>४८<br>१६०</td><td><br>३००<br>३००<br>३००</td><td><br>८,२०,८००<br>१४४००<br>४८०००</td></tr>
<tr><td>मानधन-<br>१.निवड समिती सदस्य-<br>२.पंच/ सामनाधिकारी-</td><td><br>४८<br>१६०</td><td><br>२X३००<br>२X३००</td><td><br>२८८००<br>९६०००</td></tr>
<tr><td>सादिल खर्च-</td><td></td><td></td><td>१,६०,०००</td></tr>
<tr><td colspan="3">एकूण ब -</td><td>२३,५६,०००</td></tr>
</table>
</td><td>२३,५६,०००</td></tr>
</table>

क **राज्यस्तर -स्पर्धा व निवड चाचणी आयोजन खर्च-**

| राज्यस्तर स्पर्धा | संख्या | दर/दिवस | रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| **भोजन व निवासाचा खर्च –** | | | |
| १. खो-खो व कबड्डी खेळाडू, व्यवस्थापक /मार्गदर्शक | ४४८ | ४X२५० | ४४८००० |
| २.निवड चाचणीसाठी येणारे खेळाडू | २२० | २X२५० | ११०००० |
| **प्रवासभत्ता** | | | |
| १.खो-खो, कबड्डी, बास्केटबॉल खेळाडू, व्यवस्थापक व मार्गदर्शक- | ६६८ | १००० | ६६८००० |
| २.निवडसमिती सदस्य | ९ | १००० | ९००० |
| ३.पंच/ सामनाधिकारी | २४ | १००० | २४००० |
| **मानधन-** | | | |
| १.निवड समिती सदस्य- | ०९ | ४X५०० | १८००० |
| २.पंच/ सामनाधिकारी- | २४ | ४X५०० | ४८००० |
| **सादिल खर्च-** | प्रति खेळ रु.१ लक्ष प्रमाणे ३ खेळ प्रकारांसाठी. | | ३००००० |
| | | **एकूण –क** | १६,२५,००० |

| | | |
|---|---|---|
| क | राज्यस्तर -स्पर्धा व निवड चाचणी आयोजन खर्च- | **१६,२५,०००** |
| | **एकूण (क+ब+अ)** | **६१,४१,०००** |

Digitally signed by Sameer Anant Sawant
Date: 2022.05.06 12:59:33 +05'30'

**(समीर सावंत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय क्रमांकः केआपी-१९२१/प्र.क्र.२५५/क्रीयुसे-१, दिनांक ६ मे, २०२२ सोबतचे परिशिष्ट.**

४ थी खेलो इंडिया युवा राष्ट्रीय स्पर्धा, हरियाणा-२०२१ - राष्ट्रीय स्पर्धापूर्व प्रशिक्षण शिबीर व राष्ट्रीय स्पर्धा सहभाग खर्च.

**परिशिष्ट-ब**

| अ.क्र. | खर्चाची बाब | खर्चाचे विश्लेषण | अंदाजित खर्च |
|---|---|---|---|
| १ | **शिबीर कालावधीसाठी निवास व भोजन व्यवस्था-**<br>स्पर्धास्थळी खेळाडूंचे १३ दिवसांचे शिबीर आयोजित करण्यात येणार असून, त्यासाठी ४२० खेळाडूंच्या निवास व भोजनासाठी प्रतिदिन प्रतिव्यक्ती रु.३५०/- याप्रमाणे खर्च.<br><br>अंदाजे १३० पदाधिकारी/ मार्गदर्शक/व्यवस्थापक यांचे निवास व भोजन व्यवस्था, प्रतिदिन रु.२५०/- प्रमाणे एकूण १३ दिवसांसाठी. | १३ X ३५० X ४२०<br><br>१३ X २५० X १३० | १,९१,१०००/-<br><br>४,२२,५००/- |
| | **पुरक आहार-**<br>४२० खेळाडूंसाठी प्रतिदिन रु.१००/- प्रमाणे एकूण १३ दिवसांकरीता. | १३ X १०० X ४२० | ५,४६,०००/- |
| २ | **प्रवासखर्च-**<br>निवासस्थान ते शिबीरस्थळ, अंदाजे ५५० खेळाडू, पदाधिकारी, मार्गदर्शक, व्यवस्थपक जाण्या-येण्याचा खर्च रु.१५००/- प्रतिव्यक्ती याप्रमाणे. | १५०० X ५५० | ८,२५,०००/- |
| ३ | **प्रवासातील हातखर्ची भत्ता-**<br>अंदाजे ४२० खेळाडूंसाठी, शिबीरस्थळ ते राष्ट्रीय स्पर्धास्थळ जाणे-येणे दरम्यान हातखर्ची भत्ता.<br>(प्रवास १२ तास किंवा कमी असल्यास, प्रतिव्यक्ती रु.२५०/- व १२ तासांपेक्षा जास्त असल्यास, रु.५००/- प्रमाणे देय) | २ X ५०० X ४२० | ४,२०,०००/- |
| ४ | **मार्गदर्शक, व्यवस्थापक, सहाय्यक यांचे मानधनः-**<br>अंदाजे ४५ मार्गदर्शक व १० सहाय्यक मार्गदर्शक अशा एकूण ५५ व्यक्तींसाठी. प्रतिव्यक्ती रु.२५०/- प्रमाणे अंदाजे एकूण २० दिवसांचे मानधन. | २० X २५० X ५५<br><br>१० X २५० X ७५ | २,७५,०००/-<br><br>१,८७,५००/- |

| | | | |
|---|---|---|---|
| | अंदाजे ७५ व्यवस्थापक व इतर सहाय्यक व्यवस्थापक यांचेसाठी प्रतिव्यक्ती रु.२५०/- प्रमाणे अंदाजे एकूण २० दिवसांचे मानधन. | | |
| ५ | **फिजिओ, मानसोपचारतज्ञ व मसाजिस्ट यांचे मानधनः-**<br>प्रशिक्षण शिबीर कालावधीत १३ दिवस महाराष्ट्र संघासाठी रु.२५०००/- प्रतिव्यक्ती याप्रमाणे एकूण ३ व्यक्तींचे मानधन.<br>राष्ट्रीय स्पर्धा कालावधीत महाराष्ट्र संघासाठी रु.२५०००/- प्रतिव्यक्ती प्रमाणे एकूण ३ व्यक्तींचे मानधन. | २५००० X ३<br><br>२५००० X ३ | ७५,०००/-<br><br>७५,०००/- |
| ६ | **वैद्यकीय साहित्य खरेदी:-**<br>(उदा.आईसपॅक, वेदनाशामक स्प्रे, क्रेप बँन्डेज इ. एकूण २२ खेळप्रकारांना रु.१०,०००/- प्रतिखेळ याप्रमाणे.) | १०००० X २२ | २,२०,०००/- |
| ७ | **मैदान सेवक मानधन-:**<br>२२ खेळप्रकारांना रु.३००/- प्रतिदिन प्रतिव्यक्ती याप्रमाणे १३ दिवसांकरीता. | १३ X ३०० X २२ | ८५,८००/- |
| ८ | **मैदान देखभाल तथा क्रीडा साहित्य खरेदी**-:<br>स्पर्धापूर्व प्रशिक्षण शिबीर कालावधीत २२ खेळांसाठी प्रतिखेळ रु.१५,०००/- प्रमाणे खर्च. | १५००० X २२ | ४,८४,०००/- |
| ९ | **ट्रॅकसुट व गणवेश खरेदी:-**<br>४२० खेळाडूंना ट्रॅकसुट, टी शर्ट, शॉर्ट, शुज, कानटोपी व थर्मल वेअर, प्रतिव्यक्ती रु.८०००/- प्रमाणे खर्च.<br>१३० मार्गदर्शक/व्यवस्थापक व इतर यांचेकरीता ट्रॅकसुट व शुज, प्रतिव्यक्ती रु.६०००/- प्रमाणे अंदाजे १३० व्यक्तींचा खर्च. | ८००० X ४२०<br><br>६००० X १३० | ३३,६०,०००/-<br><br>७,८०,०००/- |
| १० | **राष्ट्रीय स्पर्धास्थळी निवास व भोजन व्यवस्था**-:<br>२ दिवस निवास व भोजन व्यवस्थेकरीता प्रतिव्यक्ती रु.१५००/- प्रतिदिन याप्रमाणे एकूण ५५० व्यक्तींचा खर्च. | २ X ५५० X १५०० | १६,५०,०००/- |

| | | | |
|---|---|---|---|
| ११ | **मिडिया एजेन्सी, फोटो व व्हिडीओ चित्रीकरण:-**<br>स्पर्धापूर्व प्रशिक्षण शिबीरस्थळ व राष्ट्रीय स्पर्धा कालावधीतील खर्च. | १ X ५,००,०००/- | ५,००,०००/- |
| १२ | **हवाई प्रवास खर्च**-:<br>५५० खेळाडू, पदाधिकारी, मार्गदर्शक, व्यवस्थापक यांना राष्ट्रीय स्पर्धेत सहभागी होण्यासाठी जाण्याचा एकवेळचा हवाईप्रवास खर्च रु.४०००/- प्रतिव्यक्ती याप्रमाणे.<br>राज्याचे नोडल ऑफीसर, चेफ दि मिशन व मुख्य व्यवस्थापक तसेच इतर अधिकारी यांचा राष्ट्रीय स्पर्धेची पुर्वतयारी व बैठका यासाठी जाणे-येणे साठीचा हवाई प्रवास खर्च रु.१२०००/- प्रतिव्यक्ती प्रमाणे अंदाजे ४ व्यक्तींचा २ वेळच्या जाण्या-येण्याचा खर्च. | ४००० X ५५०<br><br>२ X १२००० X ४ | २२,००,०००/-<br><br>९६,०००/- |
| १३ | **सादिल तथा आकस्मिक खर्च**-:<br>स्टेशनरी, शुभेच्छा कार्यक्रम, पत्रकार परिषद, प्रशिक्षण तळ ते विमानतळ/रेल्वे स्टेशन दरम्यानचा खर्च तथा आकस्मिक उद्धवणाऱ्या बाबींवरील खर्च. | ७,००,००० X १ | ७,००,०००/- |
| | **एकूण - रुपये** | | १,४८,१२,८००/- |

**एकूण (परिशिष्ट-अ + परिशिष्ट-ब) = ६१,४१,००० + १,४८,१२,८०० = २,०९,५३,८००/-**

**(अक्षरी रुपये दोन कोटी, नऊ लक्ष, त्रेपन्न हजार, आठशे फक्त)**

Digitally signed by Sameer Anant Sawant
Date: 2022.05.06 12:59:49 +05'30'

**(समीर सावंत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**